स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित दारिद्रय रेषेखालील स्वयंसहायता गटातील महिलांना व महिला स्वरोजगारींना यशस्विनी सामाजिक अभियान माध्यमातून प्रशिक्षण देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
परिपत्रक क्रमांक :स्वग्रायो-२००९/प्र.क्र. २१४ /योजना-३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९

**परिपत्रक :**

स्वयंसहायता गटातील महिलांना त्यांनी बनविलेल्या वस्तुचा दर्जा, आकर्षक बांधणी व विक्री व्यवस्था याबाबत शास्त्रोक्त पध्दतीने सखोल प्रशिक्षण देणे आवश्यक असल्याने यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, सिंबॉयसीस इन्स्टिटयुट ऑफ बिजनेस मॅनेजमेंट पुणे व यशस्वीनी अभियान यांच्या सहकार्यातून व व्हर्च्युअल सेंटर्सच्या माध्यमातून सुमारे ४१ व्हर्च्युअल सेंटर्स मधुन सुमारे ३०२४ महिलांना प्रशिक्षीत करण्याचा कार्यक्रम राबविण्यात आला. या उपक्रमानंतर मा.यशवंतराव चव्हाण यांच्या दिनांक १२ मार्च २०१३ जन्मशताब्दी दिवसापर्यन्त महाराष्ट्रातील सुमारे ५ लाख महिलांना प्रशिक्षीत करण्याचे उद्दीष्ट ठेविले आहे. या प्रशिक्षणाचा लाभ स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित दारिद्रय रेषेखालील स्वयंसहायता गटातील महिलांना व महिला स्वरोजगारींना मिळावा यासाठी यशस्विनी अभियान, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई यांनी सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

२. स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार ही ७५% केंद्र पुरस्कृत, दारिद्रय निर्मुलनासाठीची योजना राबविण्यात येते. दारिद्रय रेषेखालील व्यक्तींच्या स्वयंसहाता गटांना तसेच वैयक्तीक स्वरोजगारींना अनुदान व बँकेमार्फत कर्ज उपलब्ध करुन देवून रोजगाराची निर्मिती करणे जेणेकरुन दारिद्रय निर्मुलन होईल हे प्रमुख उद्दीष्ट आहे. त्यानुसार स्वयंसहायता गटाच्या सदस्यांना तसेच वैयक्तीक स्वरोजगारींना त्यांच्या स्वरोजगारासाठी कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देणे या योजने अंतर्गत अपेक्षित आहे. या प्रशिक्षणासाठी प्रशिक्षण संस्था शोधुन काढण्याबाबत केंद्र शासनाने विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वातील परिच्छेद क्र. ५.५ अन्वये मार्गदर्शक तत्वे विहित केले आहेत. त्यानुसार जिल्हा व गट पातळीवर औद्योगीक प्रशिक्षण संस्था, तंत्रनिकेतन, कृषि विज्ञान केंद्र, खादी व ग्रामोद्योग मंडळ, राज्य ग्राम विकास संस्था, विस्तारित प्रशिक्षण केंद्र, नावाजलेल्या स्वयंसेवी संस्था व त्या क्षेत्रात असलेल्या कोणत्याही विभागाच्या सुविधा या विद्यमान मुलभूत सुविधांचा वापर प्रशिक्षणासाठी करता येईल. त्याचप्रमाणे योग्य प्रशिक्षणासाठी खाजगी आद्योगीक घटकांचा वापरही करता येईल. मात्र नावाजलेल्या व इतरत्र उपलब्ध नसलेल्या उत्कृष्ट मुलभूत सुविधा असलेल्या खाजगी संस्था व्यतिरिक्त अन्य

खाजगी संस्थाचा सर्वसाधतः वापर करता येवू नये. निवडलेल्या संस्थेकडे विद्याशाखा, इमारत इ.बाबतच्या पुरेशा सुविधा असणे आवश्यक आहे.

३. स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेतील केंद्र शासनाने विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांतील सूचना क्र.५.३ अन्वये, पायाभूत दिशा निदेशन कार्यक्रम - स्वयंरोजगार करणाऱ्या व्यक्ती आवश्यक कौशल्य धारण करीत असतील तर कर्ज वितरण करण्यापूर्वी पायाभूत दिशा निदेशन कार्यक्रम ठेवण्यात येईल, हा अनिवार्य कार्यक्रम निवासापासून दूर नसणाऱ्या मुख्य कार्यालयाच्या ठिकाणी आयोजीत करण्यात यावा. स्वयंरोजगार करणाऱ्या व्यक्तींना स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेची उद्दिष्टे, स्वरोजगारी व्यक्तीची जबाबदारी आणि वर्तन विषयक दृष्टीकोन यांचाही परिचय करुन देणे हा या पायाभूत दिशानिदेशक कार्यक्रमाचा हेतू असेल. हा कार्यक्रम दिलेल्या आधारभूत किंवा संलग्न कार्यक्रमातून यशस्वी कथांवर लक्ष केंद्रीत करुन तसेच शक्य त्या जोखिमांबाबत लक्ष ठेऊन स्वयंरोजगार योजनेतून आत्मविश्वास निर्माण करण्याचा देखील हेतू असून या कार्यक्रमामध्ये बुक किंपींगची मुळ तत्वे, बाजारपेठेचे ज्ञान, उत्पादन खर्च, उत्पादनाची किंमती निश्चिती व बँकेकडून करण्यात येणाऱ्या कर्ज पुरवठ्याच्या उद्दिष्टांची ओळख इत्यादींचा समावेश असून सदर कार्यक्रम अत्यंत थोडक्या कालावधीसाठी म्हणजेच साधारणतः दोन दिवसापेक्षा जास्त नसावा. गट विकास अधिकारी, बँकर्स व संबंधित विभाग हे कार्यक्रमाचे सूत्रधार म्हणून कार्यरत असतील. या प्रशिक्षणाचा खर्च जसे, प्रशिक्षण साधन सामुग्री, व्यक्तींचे मानधन, प्रवास, आहार यासाठीचा खर्च जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेच्या निधीतून भागविण्यात यावा अशी तरतूद आहे.

४. उपरोक्त तरतुदीनुसार स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित झालेल्या दारिद्रय रेषेखालील स्वयंसहायता गटातील महिला सदस्यांना अथवा महिला स्वरोजगारींना अशा प्रकारे प्रशिक्षण देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

५. त्यानुसार प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, यांनी संचालक, यशस्विनी सामाजिक अभियान, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई, जनरल जगन्नाथराव भोसले मार्ग, नरिमन पॉईन्ट, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०२१ (दूरध्वनी क्र. ०२२- २२०२८५९८/ २२८५२०८१/ मोबाईल क्र. ९८२२७५००३३/ ९४२२२७२८८८/ फॅक्स २२८५२०८३) यांचेशी संपर्क करुन, सदर प्रशिक्षण कार्यक्रम खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून पूर्ण करावा :-

क प्रशिक्षणार्थी स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित स्वयंसहायता गटातील दारिद्रय रेषेखालील महिला असतील.

ख प्रशिक्षण जिल्हयातच शक्यतो प्रशिक्षणार्थी महिला ज्या भागातील आहेत त्या भागात देण्यात यावे.

ग प्रशिक्षण सध्याच्या गरजेनुसार बचत गटांनी बनविलेल्या वस्तूंचे पॅकींग, ब्रँडींग, मार्केटींग इ. विषयांवर असावे.

घ यशस्वी अभियान यांनी दर्शविलेला एकूण खर्च प्रती प्रशिक्षणार्थी महीला रु.८५/- पेक्षा जास्त नसेल, यामध्ये प्रवासखर्च अंतर्भूत नसुन तो स्वतंत्र असावा व किमान प्रवासखर्च प्रशिक्षणार्थीना देण्यात यावा.

च प्रशिक्षणार्थींची यादी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून घ्यावी, जिल्हा ग्रामीण विकास

यंत्रणेने सुचविलेले प्रशिक्षणार्थी प्रशिक्षणासाठी पात्र असतील.

छ प्रशिक्षणाच्या संबंधित जिल्हयात प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा हे त्या जिल्हयातील प्रशिक्षण योजनेचे संनियंत्रण करतील.

ज प्रकल्प मुल्यांकनाच्या दृष्टीने प्रशिक्षणाच्या संबंधित जिल्हयातील प्रकल्प संचालक हे संबंधित कार्यक्षेत्रातील प्रत्येक प्रशिक्षणात भाग घेतलेले प्रशिक्षणार्थी, त्यांना देण्यात आलेले प्रशिक्षण व प्रशिक्षणातून लाभार्थ्यांनी घेतलेल्या ज्ञानाचा उपयोग केल्याच्या, इ.बाबतची नोंद ठेवतील व जिल्हयाचा एकत्रित अहवाल शासनास सादर करतील.

झ प्रशिक्षणार्थीच्या प्रशिक्षणाचा खर्च, प्रवासाचा किमान खर्च संबंधित जिल्हयांच्या प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचेकडून संबंधित संस्थेला अदा करण्यात येतील.

न प्रशिक्षणाचा खर्च स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनासाठीच्या निधीतून प्रशिक्षण शिर्षा अंतर्गत भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रं. **२००९०८३११४४८०८००१** असा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

३१।०८।२

(रा.शं.नागरे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, (सर्व)

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)

३) उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व)

४) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)

५) संचालक, यशस्विनी सामाजिक अभियान, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई, जनरल जगन्नाथराव भोसले मार्ग, नरिमन पॉईन्ट, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०२१

६) निवड नस्ती (कार्यासन योजना-३)